सन २०१५-२०१६
राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान
योजनेच्या अंमलबजावणीसाठी
नवीन पदनिर्मिती करणे.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नाआअ-२०१५/प्र.क्र.९/आरोग्य-७अ**
**गोकुळ तेजपाल रुग्णालय इमारत,ए-विंग, १० वा मजला**
**नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
दिनांक : **२ जुन, २०१५**

वाचा -

१) शासन निर्णयक्रमांकःसा.आ.वि.शा.नि.क्र.पीएचडी-३००११/६८/२०१४/आ७ ,दि.३.९.२०१४
२) शासन निर्णय क्रमांकःसा.आ.वि.क्र. पीएचडी-३००११/५०८/२०१४/आ-७/,दि.४.३..२०१५
३) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक-पदनी -२०१३/प्र.क्र ११/१३/विसु-१,दि.२.२.२०१३

प्रस्तावना -

**राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान** ही नवीन केंद्र पुरस्कृत योजना सन २०१३-२०१४ मध्ये राज्यात कार्यान्वित करण्यात आली आहे. या योजनेसाठी दि.२४.२.२०१४ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत राज्य मंत्रीमंडळाची मान्यता घेण्यात आली असून या योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरावर NUHM या नवीन कक्षाची स्थापना करण्यात आली आहे. दिनांक २५.७.२०१४ रोजी झालेल्या उच्चस्तर सचिव समितीच्या बैठकीत नव्याने स्थापन केलेल्या NUHM कक्षासाठी एकूण ६ पदे मंजूर करण्यास मान्यता प्राप्त झाली आहे. या ६ पदांपैकी **अवर सचिव, कक्ष अधिकारी** व **सहायक** ही ३ पदे मंत्रालयीन संवर्गातील असून उर्वरित ३ पदे **लिपीक- टंकलेखक व शिपाई** (लिपीक - टंकलेखक -२ पदे व शिपाई-१ पद ) प्रवर्गातील असून ती बाहयस्त्रोताने भरण्यात येणार आहेत. सदर ६ पदांची निर्मिती करण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. मान्यता दिलेल्या

एकूण ६ पदांचे वेतनावरील खर्च कोणत्या लेखाशिर्षाखाली करावा याबाबत संदर्भिय क्र.१ च्या शासन निर्णयात व संदर्भिय क्र.२ च्या शासन शुध्दिपत्रकात दर्शविण्यात आलेल्या लेखाशिर्षांमध्ये विसंगती असल्याने संदर्भिय क्र.१ व २ येथील आदेश अधिक्रमित करुन नव्याने आदेश निर्गमित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय** -

सन २०१३-२०१४ मध्ये राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत **राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान** या नवीन केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनस्तरावर NUHM या नवीन कक्षाची स्थापना करण्यात आली असून सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत निर्माण केलेल्या या NUHM कक्षासाठी विविध संवर्गातील एकूण ६ पदांची निर्मिती करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. या मंजूर पदांचा संवर्गनिहाय तपशिल खलीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | पदाचे नाव | एकूण मंजूर पदांची संख्या | वेतनश्रेणी | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | अवर सचिव | १ | १५६००-३९१०० | सदरची पदे मंत्रालयीन संवर्गातील आहेत. |
| २ | कक्ष अधिकारी | १ | ९३००-३४८०० | |
| ३ | सहाय्यक | १ | ९३००-३४८०० | |
| | **एकूण** | **३** | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | लिपिक टंकलेखक (मराठी) | १ | ५२००-२०२०० | सदरची पदे बाहयस्त्रोताद्वारे भरण्यात आलेली आहेत. |
| ५ | लिपिक टंकलेखक इंग्रजी) | १ | ५२००-२०२०० | |
| ६ | शिपाई | १ | ४४४०-७४४० | |
| | एकूण | ३ | | |
| | एकूण | ६ | | |

२. राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान या योजनेच्या अंमलबजावणीसाठी निर्माण केलेली उपरोक्त ६ पदे हि योजनांतर्गत योजनेवरील पदे असल्याने या पदांच्या वेतनावरील खर्च भागविण्यासाठी विभागाने २२५१ १०५८ हे नवीन लेखाशिर्ष उघडले असून या लेखाशिर्षाअंतर्गत ०१, वेतन व १३, कार्यालयीन खर्च या तपशिलवार शिर्षाखाली वरील पदांच्या वेतनावरील खर्च भागविणे आवश्यक आहे.

३. त्यानुसार परिच्छेद १ मध्ये दर्शविलेल्या एकूण ६ पदांपैकि अ.क्र. १ ते ३ येथील पदे मंत्रालयीन संवर्गातील असल्याने त्यांना वरील तक्त्यात दर्शविलेली वेतनश्रेणी लागू राहणार असून त्यांच्या वेतनावर होणारा खर्च मागणी क्रमांक आर-२, २२५१ - सेक्रेटरिएट - सामाजिक सेवा, (०१) (०५) सचिवालयातील राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान -शाखा (२२५१ १०५८) अंतर्गत ०१, वेतन या तपशिलवार शिर्षाखालील उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. तर बाहयस्त्रोताद्वारे भरण्यात आलेल्या/भरावयाच्या कंत्राटी पदांना परिच्छेद-१ मधील तक्त्यात दर्शविलेली वेतनश्रेणी लागु राहाणार नसून या पदांना ठराविक असे

मानधन देण्यात येणार आहे. या कंत्राटी पदांच्या मानधनावरील खर्च मागणी क्रमांक आर-२, २२५१ - सेक्रेटरिएट - सामाजिक सेवा, (०१) (०५) -सचिवालयातील राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान शाखा (२२५१ १०५८) अंतर्गत १३, कार्यालयीन खर्च या तपशिलवार शिर्षाखालील उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भगविण्यात यावा

५. सामान्य प्रशासन विभागाने सदर नवनिर्मित पदांच्या नियुक्तीबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०२१२१०४२३८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ujwala Arun Ransing

Digitally signed by Ujwala Arun Ransing
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ujwala Arun Ransing
Date: 2015.06.02 15:51:17 +05'30'

**(उज्वला अ.रणसिंग)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई.
४. मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.
८. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.
९. आयुक्त ( कुटुंब कल्याण ) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१०. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
११. महालेखापाल ( लेखापरिक्षण), महाराष्ट्र -१ मुंबई, महाराष्ट्र -२ नागपूर.
१२. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१ मुंबई, महाराष्ट्र-२ नागपूर.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग (सर्व) मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी ( आस्थापना) सर्वजनिक आरोग्य विभाग , मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती ( आरोग्य-७)